# शोध प्रेमाचा • वसंत पळशीकर
# प्रेम

प्रेम हा शब्द वापरायला सोपा आणि आवडीचा असला तरी प्रेमाची उमज पडायला कठीण जाते नि बऱ्याच अनुभवांमधून जावे लागते.

एखाद्या व्यक्तीची उत्कट ओढ सतत अनुभवणे, तिचा अखंड सहवास हवासा वाटणे, तिच्या विरहाने पोळणे, मनात सदैव तिच्याचविषयी विचार येत राहणे, तिच्यावरून वेडेपिसे होणे ही प्रेमात पडल्याची लक्षणे मानली जातात. अशी स्वतःची अवस्था झाली म्हणजे प्रेमिक स्वतःला धन्य समजतात. अवतीभवतीचे लोकही कौतुक, हेवा, चेष्टा करून दाद देतात.

प्रेमात पडलेल्या व्यक्तीची ही अवस्था, त्याची ही प्रतिमा ही एक स्थल-काल व संस्कृतिसंबधक गोष्ट आहे की माणसाला येणारा हा एक सनातन अनुभव आहे?

एखादी व्यक्ती मला इतकी आवडते, हवी हवीशी वाटते, तेव्हा नेमके काय घडते? आणि काही काळानंतर अनुभवांतून गेल्यावर माझे प्रेम ओसरते वा उडून जाते तेव्हा काय घडते? प्रेम करणे हा मीच माझ्यावर लुब्ध होऊन केलेला खेळ तर नसतो?

प्रेमात पडण्यात बहुतेक वेळा, विशेषतः, तरुणपणी शरीरधर्माचा भाग बराच असतो. आणि संस्कारांचाही. उदाहरणार्थ असे कालखंड व समाज आढळतात की जेथे 'बायकोवर माझे प्रेम आहे' या विधानाची हसून चेष्टा केली जाण्याची किंवा अशा पुरुषाची कीव केली जाण्याची शक्यताच जास्त होती. सामाजिकदृष्ट्या आवश्यक व बंधनकारक म्हणून पत्करलेला एक शरीरसंबंध म्हणून लग्नसंबंधाकडे पाहिले जाई. विवाहबाह्य संबंधाद्वारेच स्त्री - पुरुषांमधील खरा प्रेमसंबंध आविष्कृत होऊ शकतो, होतो अशी धारणा त्या काळात आढळते. शरीरधर्माची पूर्तता करण्यासाठी आवश्यक तो संबंध जोडलेला असताना यापलीकडे जाऊन अन्य व्यक्तीशी केवळ ती व्यक्ती ‘आवडते’, ‘प्रिय वाटते’ म्हणून जोडलेला अशरीरी संबंध तोच तेवढा खरा प्रेमसंबंध असे म्हणण्यात प्रेमाची एक व्याख्या अध्याहृत आहे. प्रेमविवाह ही रीत चांगली, वांछनीय, आदर्श; नव्हे प्रेमविवाह हाच खरा विवाह, असा संस्कार दृढ झालेल्या आधुनिक काळात शरीर व मन यांच्या तरुणपणच्या गरजा पूर्ण करण्याच्या आतल्या रेट्यामुळे उत्पन्न होणाऱ्या आकर्षणालाच ‘प्रेम’ हा शब्द योजला जाण्याची शक्यता वाढते. अशा तीव्र आकर्षणालाच प्रेम म्हणायचे हा संस्कारच असतो!

सामान्यतः प्रेमाच्या ज्या अविष्काराचे व संबंधाचे कौतुक आधुनिक वृत्तीच्या सुशिक्षित समाजात आज केले जाते तो प्रेमाचा व प्रेमसंबंधाचा प्रकार बव्हंशी आत्मलुब्धतेतून निर्माण झालेला असतो. माझ्या शरीर व मन यांच्या वासना, विकार, कामना, आकांक्षा यांच्या पूर्ततेसाठी मला सर्वस्वी माझ्या वापरासाठी, माझीच फक्त असलेली एक व्यक्ती हवी असते. 'माझे तुझ्यावर प्रेम आहे' असे म्हणून वस्तुतः मी माझा हा खास मक्तेदारी अधिकार/हक्क प्रस्थापित करीत असतो. उत्कटता, आवेग, भावनांचे प्रदर्शन, माझे वेडेपिसे होणे यापैकी कोणतीच गोष्ट खोटी वा दांभिक नसते. माझ्या एका विशिष्ट शारीरिक-मानसिक अवस्थेची ती अभिव्यक्ती असते. कालांतराने ही माझी अवस्था बदलते. तशी ती बदलणे अपरिहार्य असते. प्रेम ओसरल्याचा, आटल्याचा अनुभव माझा मलाही येतो, व दुसऱ्या व्यक्तीलाही येतो.

देह आहे तोवर शरीर व मन यांचे धर्म प्रत्येक व्यक्तीला कमी अधिक प्रमाणात चिकटलेले राहतात. जगाच्या इतिहासात यालाही अपवाद असलेल्या काही व्यक्ती होऊन गेल्या असे म्हणता येईल. पण त्यांच्या असण्याने नियम सिद्ध होतो असे म्हणू या वासना, विकार, कामना, आकांक्षा यांच्या रेट्यांची बाह्य अभिव्यक्ती म्हणून एखाद्या व्यक्तीविषयी वाटणारी उत्कट ओढ म्हणजे प्रेम नव्हे, तो प्रेमाचा आभास आहे हा नीर-क्षीर विवेक करण्याची आवश्यकता ध्यानात येणे हा प्रेमाविषयी सम्यक जाण उत्पन्न होण्याच्या दृष्टीने निर्णायक टप्पा म्हणता येईल.

दोन व्यक्तींमध्ये खरे प्रेम असले तर शरीर व मन यांच्यापलीकडे त्यांनी गेलेले असणे ही प्रेमाच्या खरेपणाची कसोटी आहे असे मात्र म्हणण्याचे कारण नाही. शरीर व मन यांचे कार्य गर्हणीय वा क्षुद्र मानण्याचे कारण नाही. प्रेम असलेल्या

व्यक्तीविषयी शारीर आकर्षण वाटणे, तिचा सहवास हवासा वाटणे, तिचा मानसिक आधार गरजेचा वाटणे इत्यादी गोष्टींनी अपराधी वाटण्याचे कारण नाही. पण याच गोष्टींच्या आधारे आपण प्रेम हा शब्द वापरण्याची गफलत तर करीत नाही ना, असा प्रश्न मात्र अवश्य उपस्थित करावयास हवा.

शरीराचे व मनाचे व्यापार पूर्णपणे वगळले, बाद केले तर खाली काही उरते का? आधुनिक विज्ञानाच्या चौकटीच्या आधारे पाहू गेल्यास काहीच उरत नाही. पण शरीर व मन यांच्या व्यापारांकडे, खेळाकडे तटस्थपणे पाहण्याची, क्रिया-प्रतिक्रियात्मक व्यवहारांना छेद देऊन नवे काही सर्जन करण्याची, बौद्धिक तर्काने नव्हे तर अन्य मार्गांनी गोष्टी जाणण्याची व अनुभवण्याची क्षमता माणसात आहे. ती शरीरातच वास करते व चिखलातून कमळ उगवते तशी ती शरीर व मन यांच्या आधारेच उमललेली असते, पण त्यांच्यापेक्षा वेगळी असते, ही अनुभवाची गोष्ट आहे. 'अहं' (ईगो) या अर्थाने अनुभवास येणाऱ्या 'मी' हून गुणात्मकदृष्ट्या वेगळे असलेले हे अस्तित्व, हे भान, हे अत्यंत सक्रिय केंद्र याला उद्देशून अनेक शब्द वापरले गेले आहेत. पण महत्त्व शब्दांना नाही, अस्तित्वाच्या, 'मी' पणाच्या या पातळीवर जगण्याला महत्त्व आहे.

साधुसंत, महात्मे, साधक जेव्हा प्रेम हा शब्द वापरतात तेव्हा निर्मम होण्याची, शरण जाण्याची, 'स्व'चा लोप करून एकरुप होण्याची गोष्ट करतात. बहुधा ते ईश्वराला शरण जाण्याची, ईश्वराशी एकरूप होण्याची गोष्ट करतात. आपण काय म्हणतो आहोत तें सामान्य संसारी लोकांना सहजी कळावे, या दृष्टीने प्रियकर-प्रेयसीमधील संबंधाचे उदाहरण देण्याची त्यांची एक रूढ रीत आहे. लौकिक व्यवहारातही प्रेमाच्या अवस्थेत, मिलनाच्या क्षणी 'स्व'चा लोप होऊन दोन व्यक्ती एकच होऊ पाहातात वा एक होतात हीच परमोच्च कोटीच्या प्रेमाची खूण मानलेली असावी ही अर्थपूर्ण गोष्ट आहे. दोघांनीही 'स्व' चा लोप केलेला असला तर कोण कोणाशी एकत्व अनुभवतो असे म्हणायचे? हे उदाहरण दिले जाते ही गोष्ट योग्यच आहे. कारण शरीर व मन यांचे 'धर्म' पुरविण्याच्या रेट्यातूनही जेव्हा दोन व्यक्ती प्रेमात पडतात, वेडीपिशी होतात व मिलनाच्या क्षणी एकत्व अनुभवतात तेव्हा क्षणिक का होईना अस्तित्वाच्या एका वेगळ्या पातळीवर ती जगतात. या पातळीवर माझे तुझे हे शब्द उरत नाहीत. त्यांचा निरास होऊन फक्त एकत्वाची दिव्य अनुभूती उरते.

इतरांपासून वेगळा म्हणून मी जन्माला येतो. माझा वेगळेपणा, पृथकत्व हा माझ्या व्यक्तित्वाचा आधार असतो. माझ्याविषयी मला ममत्व असते. माझ्या वासना, विकार, कामना, आकांक्षा, स्वार्थ, उद्दिष्ट, ध्येय इत्यादींसह जगताना इतरांशी मी समाजात जोडला जातो. पण या जोडलेपणाचाच एक भाग हाही असतो की मी एकाकी व अलग पडत राहतो. मी व इतर यातले अंतर काटून एकत्वाची प्रचिती घेण्याची उर्मी माणसामध्ये खोलवर असते असे दिसते. आईच्या पोटात असताना मूल आईशी एकरूप असते. जन्माच्या वेळी त्याची ताटातूट एका अर्थी, जबरीने घडून येते, ते टाहो फोडते. ते भयचकित अवस्थेत असते. या पार्श्वभूमीवर असेही म्हणता येईल की, भयचकित करणारे वेगळेपण संपुष्टात आणणाऱ्या एकत्वाच्या एकत्वाच्या अनुभूतीनेच माणसाला, शांतीचा, कृतार्थतेचा प्रसन्नतेचा, पूर्णत्वाचा, मुक्तीचा अनुभव येतो. या अनुभवासाठी तो सदैव आसुसलेला असतो. त्यासाठी व्याकूळ अशी त्याची अवस्था असते. ही भयग्रस्त, एकाकी, अलग स्थिती ओलांडून पार जाणे प्रेमाच्या आधारे व प्रेमसंबंधाच्या योगेच शक्य होते. प्रेमभावनेचा, प्रेमसंबंधाचा गाभा हा 'स्व'चे विसर्जन. समर्पण यात आहे.

एखादी व्यक्ती आपल्याला आवडते तेव्हा आरंभी तरी तिच्या काही गुणवैशिष्ट्यांसाठी ती आवडते. तिचे रूपसौंदर्य असेल, बुद्धीची तल्लखता असेल, कलागुण असतील, सालस वृत्ती असेल. कोणाला समोरच्या माणसातले काय आवडेल हे सांगता वा ठरविता येत नाही. व्यक्ती काही गुण वैशिष्ट्यांमुळे आवडणे आणि त्या व्यक्तीच्या प्रेमात पडणे या परस्परांशी निगडित पण गुणात्मकदृष्ट्या वेगळ्या गोष्टी आहेत. धोरणीपणाने, अन्य हेतू मनात बाळगून, 'शिकार' करण्याचे तंत्र म्हणून अर्थातच प्रेम असल्याचे नाटक करता येते, केलेही जाते. पण जिथे ही अभिव्यक्ती प्रांजळपणे, निरलक्षपणे, अंतःकरणाच्या खोल गाभ्यातून येते तिथे आवडीनिवडीच्या, लौकिक हिशेबाच्या पलीकडे माणूस पोचलेला असतो. प्रेमाची अभिव्यक्ती व तिला मिळणारा प्रतिसाद यांचा ज्यांनी अनुभव घेतला आहे त्यांना हे पटेल की त्या क्षणी शरीर व मन यांचे धर्म- पार मागे टाकून व्यक्ती पुढे गेलेल्या असतात. त्याक्षणी जे मिलन घडते ते एक पळभरच असेल, पण प्रथमतः दोघांच्याही लौकिक व्यक्तिमत्वांचे मनोमन विसर्जन घडवून आणणारे असते. नंतरच्या क्षणी याच एकत्वाची लौकिक अभिव्यक्ती परस्परांच्या

मिठीत विसावण्यात वा अन्य प्रकारे होईल व होतेही.

माझे अहंकेंद्री 'मी' पण जेथे विरघळून जाते अशी एकत्वाची अनुभूती म्हणजे प्रेम अशी व्याख्या करणे कितपत बरोबर? एखाद्या व्यक्तीविषयी 'ती फार प्रेमळ आहे' असे आपण म्हणतो तेव्हा असेच म्हणत असतो ना की, इतरांशी वागत असताना ती 'स्व'/'अहं' विसरते. दुसऱ्यासाठी जीव टाकते. तिच्या वागण्यात ओलावा असतो. हा एक प्रकारचा पडताळाच आहे. प्रेमळ माणसाचे मन, अंतःकरण विशाल असते. ते इतके विशाल होऊ शकते की, मानवमात्रांना, सर्व भूतमात्रांना, किंवा विश्वालाच ते कवेत घेऊ शकते. संत ज्ञानेश्वर, संत तुकाराम, रामकृष्ण परमहंस, संत फ्रान्सिस (ऑफ अर्सीसी), भगवान गौतम बुद्ध, येशू ख्रिस्त ही माणसे प्रेमाच्या पातळीवरच कायमची जगत होती.

आधुनिक काळात आपली अडचण अशी आहे की, आधुनिक पाश्चात्य नागर संस्कृतीची उभारणीच स्वार्थ अहंकेद्रितता यांच्या परिपोषाला मध्यवर्ती स्थान देऊन केली गेली आहे. आधीच समाजाची रचना पुरुषसत्ताक होती. तीवर हे पुढचे कलम केले गेले. आधुनिक विज्ञानाच्या बुद्धिप्रामाण्यवादी रीतींच्या द्वारे प्राप्त होऊ शकणारे शरीर व मन यांचे सप्रमाण ज्ञान तेवढेच खरे असे मानून आपण केवळ ईश्वर, आत्मा हे शब्दच बाद केले आहेत असे नाही, साक्षात प्रचितीच्या आधारे जाणलेल्या सत्याकडे इशारा करणाऱ्या या शब्दांच्या बरोबर या सत्याचेही प्रामाण्य नाकारले आहे. जळत्या घरातून कोणाचा जीव वाचविण्यासाठी एखाद्याने स्वतःचा जीव धोक्यात घातला तर त्या वर्तनाचेही स्पष्टीकरण, त्यातच त्याचा स्वार्थ होता/त्यातच त्याचे सुख होते असे करण्यापर्यंत, म्हणजे ही एक प्रकारची अॅबनॉर्मल, विकृतीकडे झुकणारीच गोष्ट आहे असे सुचविण्यापर्यंत आपण आज गेलो आहोत.

व्यक्तित्वाची जडण घडण जितकी आधुनिक, पाश्चात्य संस्कृतीने प्रभावित तितका प्रेमसंबंध हाही एक व्यावहारिक कंत्राटी संबंध बनण्याची/ठरण्याची शक्यता अधिक. प्रेम करण्याच्या व अभिव्यक्त करण्याच्या क्षणी ज्या वेगळ्या पातळीवरून मी संबंध जोडत असतो, व जी माझी फार आंतरिक अशी उर्मी व गरज असते ती उर्मी, गरज वा पातळी माझी मलाच उमजलेली नसते. उमजण्याच्या आडच माझी जडणघडण येते. प्रेमविवाह हे बहुधा ठरवून झालेल्या परंपरागत विवाहांपेक्षा अधिक चटकन कंत्राटी पातळीवर येताना दिसतात. ते लौकरच सत्तासंबंधांत परिणत होतात. आजच्या समाजव्यवस्थेच्या व संस्कृतीच्या चौकटीत व त्यांच्याशी संवादी राहून केले जाणारे प्रेम, मक्तेदारी व सत्ता संबंध प्रस्थापित करणारेच असू शकते. यात बहुसंख्य वेळा पुरुषाची सरशी होणेही क्रमप्राप्तच ठरते.

म्हणूनच अस्सल, खरे प्रेमसंबंध ही आजच्या व्यवस्थेच्या व संस्कृतीच्या दृष्टीने फार क्रांतिकारक, स्फोटक शक्ती आहे. तिच्या पायाशी सुरुंग पेरणारी ही शक्ती आहे. एका अर्थी हे सत्य 'हिप्पी संप्रदाय' या नावाने ओळखल्या जाणाऱ्या तरुण तरुणींनी जाणले होते. जेथे जातील तेथे या मंडळींनी मोठी अस्वस्थता व खळबळ निर्माण केली होती! पण ही शक्ती विरून गेली. याचे एक कारण अखेरीस त्यांची बंडखोरी परोपजीवी जीवनात व उपभोगवादी स्वैर लैंगिक संबंधांत अध:पतित झाली. पण आधुनिक पाश्चात्त्य संस्कृती व व्यवस्थेच्या नाजूक वर्मावर नेमके बोट त्यांनी ठेवले हे श्रेय त्यांना आहे. स्त्रीमुक्तीची आधुनिक काळातली चळवळ अद्यापपावेतो निष्प्रभ ठरली आहे. याचे कारण मात्र वेगळे आहे. 'सेक्शुअल पॉलिटिक्स' 'सेक्स अँड जेंडर' 'स्त्रीचे समान हक्क व अधिकार' 'पुरुषांशिवाय स्त्रियांचे परिपूर्ण जग व अस्तित्व' या अंगाने मांडणी करण्यावर भर राहिला आहे. पुरुषसत्ताकतेविरुद्ध हवा चढविण्यात एका मर्यादित यश जरूर मिळाले. पण मूळ व्यवस्था व संस्कृती यांना सुरुंग न लागता अनेकानेक स्त्रियांना कौतुकाने बरोबरीची सत्तेची स्थाने, मत्तेचा मलिदा व प्रतिष्ठा/दर्जा यांचा लाभ मिळण्यात चळवळीचे यश साठवले, गोठवले जात आहे. आधुनिक पाश्चात्य पुरुषसत्ताक व्यवस्था व संस्कृतीला मुळातून आव्हान देऊन बंधुभाव, समता, न्याय, स्वायत्तता यावर आधारलेली नवी शांतीपूर्ण, सृजनशील, माणुसकीचे सुंदर संबंध असलेली समाजव्यवस्था व संस्कृती निर्माण करण्याचे एक मुख्य हत्यार प्रेमसंबंध आहे.

स्वार्थाचा लोप होत नसेल, 'अहं' विरघळून जात नसेल, लीन होण्यात आनंद अनुभवायला येत नसेल, माणूस लोण्याहूनही मऊ होऊन जात नसेल तर ते प्रेम नाही असे ओळखावे. ज्याचे व्यक्तित्व आधुनिकतेच्या संस्कारांनी घडलेले असेल त्याचे प्रेम, भाषा व देखावा जरी समर्पणाचा असला तरी ते प्रत्यक्षात आक्रमक, आग्रही, सतत मागण्या करणारे (एक्झॉस्टिंग व

डिमांडिंग) मालकी प्रस्थापित करू पाहणारे असण्याची शक्यताच अधिक. रोमँटिक प्रेमही आधुनिक पाश्चात्य संस्कृतीच्या चौकटीतले असते तेव्हा आत्मलुब्धतेतच त्याचा उगम व परिपोष असतो. रोमँटिक नसेल व 'बुद्धिवादी' असेल तर माझा समान वाटा टाक, मला न्याय मिळालाच पाहिजे, मी अमुक - तमुक खपवून का घेऊ, माझेही हक्क आहेत, मी का जुळवून घेऊ तूच जुळवून घे, या भाषेत ते बोलणार व वागणार. आजचा स्त्रीवादही (फेमिनिझम) वैचारिक- सांस्कृतिकदृष्ट्या आधुनिक पाश्चात्य व्यवस्था व संस्कृतीचाच घटक असलेला वाद आहे. प्रेम व प्रेमसंबंध यांचा या संस्कृतीशी व व्यवस्थेशी मेळ बसत नाही.

सत्ता-मत्ता प्रतिष्ठा/दर्जा यांना मध्यवर्ती महत्त्व देणाऱ्या, त्यांचे स्वतःच्या हाती केंद्रीकरण करण्यास अग्रक्रम देणाऱ्या कोणत्याही संस्कृती व व्यवस्थेशी प्रेमाचा मेळ बसत नाही. इतकेच नाही तर, प्रेमाचा करूणा व बंधुभावाचा, सेवाभावाचा संदेश पसरविणाऱ्या व्यक्ती वा संप्रदाय वा चळवळी या सर्वात धोकेबाज मानल्या जातात. अट्टल गुन्हेगार बाराब्बासला मोकळे सोडून ख्रिस्ताला सूळावर द्या अशी मागणी लोकांनी उगीच नाही केली. बुद्धाच्या शिकवणुकीचा पराभव करून ती निष्प्रभ करण्याची गरज भारतातील 'क्षत्रिय' राजेरजवाडे व पुरोहित ब्राह्मण वर्ग यांना उगाच नाही वाटली. आणि महात्मा गांधींचीही हत्या करण्याची जरूरी यातूनच उत्पन्न झाली.

या दृष्टीने विचार केल्यास स्त्री व पुरुष दोघांनाही मुक्त करणारी आणि एक वेगळाच समाज अस्तित्वात आणण्यासाठीची स्त्रीवादी चळवळ ही प्रेमाच्या अधिष्ठानावर उभारली जायला हवी.

थोडे विषयांतर करून येथे आपण एक प्रश्न विचारू या. प्रेम या शब्दाचा वापर आदिवासी टोळी समाजामध्ये जाणीवपूर्वक केला गेला असेल का? तो अतिशय महत्त्वाची शब्द कधी व का बनला असेल? टोळीचे अस्तित्व/जीवन अबाधित राखणे, टोळीचे ऐक्य दृढ राखणे या भोवती टोळीचे समूह-जीवन संघटित झालेले असते. आदिवासी टोळीतल्या व्यक्तींना व्यक्तित्व प्राप्त झालेले असते.

पण आदिवासीपणही अनाघ्रात स्वरुपात टिकून असते. याचाच अर्थ असा की, व्यक्ती व समाज निसर्गसहज (ऑरगॅनिक/नॅचरल) अशा चौकटीतच जगत असतात. निरागसपणा असतो. लहान मुलांच्या ठायी असलेल्या निरागसतेशी तुल्यबळ असा. आदिवासी व्यक्तीही प्रेमात पडतात, प्रेमसंबंध जोडतात, त्यांनाही रीतीरिवाज व नीतिनियम यांची बंधने असतात. यामुळे प्रेमसंबंध अनेकदा गुंतागुंत व ताण निर्माण करतात. गुंता सोडविण्याच्या व ताण दूर करण्याच्या रीतीही असतात. पण या सगळ्यात प्रेम व प्रेमसंबंध यांची बौद्धिक मांडणी व तत्त्वचर्चा जाणीवपूर्वक करण्याची गरज पडत नाही.

टोळीसमाजाचा टप्पा ओलांडून पलीकडे पोचलेल्या नागर समाजाच्या व्यवस्थेला व संकल्पनेला उद्देशून निसर्गसहज, निरागस हे शब्द लावता येत नाहीत. कारण जेत्यांनी जित समुदायांना पददलित बनवून दमन, पिळवणूक, विषमता, उच्च नीच भेद यावर बुद्ध्या उभारलेला मोठा समाज असे मूलतः परिवर्तन होते. संत्ता, मत्ता व दर्जा/मान/ प्रतिष्ठा या संघटक सूत्रांच्या आधारे पुरुषसत्ताक समाजव्यवस्था व संस्कृतीची प्रस्थापना तेव्हाच झाली. या सूत्रांचा शिरकाव, सर्वांगात विष भिनावे तसा, व्यक्ती, कुटुंब व समाज या तिन्ही पातळ्यांवर झालेला आपणास आढळतो. मूठभरांच्या जीवनात काव्यशास्त्रविनोदनाला अवसर उत्पन्न झाला, चैन विलासही काहींच्या वाट्याला आला, वैचारिक, वैज्ञानिक, तंत्रवैज्ञानिक, कला साहित्य अशा क्षेत्रांमध्ये संस्कृतीला बहर आला. अथेन्समधील ज्या ग्रीक संस्कृतीचे श्रेष्ठत्व सांगितले जाते ती केवळ हजारो-लाखो गुलामांच्या जिवावर जगणारी संस्कृती होती इतकेच नाही, वंश चालू ठेवण्यासाठी स्वतःच्या मुलांना जन्म देणाऱ्या स्त्रीशी प्रेमाचा संबंध संभवत नाही, कारण ती केवळ प्रजोत्पत्तीसाठी आहे, तिच्याशी येणारा यौनसंबंधही त्यासाठीच आहे, ही धारणा बाळगणारी ही संस्कृती होती. माणसाला माणसापासून तोडणाऱ्या, जीवन व संबंध यातला निरपेक्ष, निरलस ओलावा नष्ट करणाऱ्या, माणसाचे माणूसपण हिरावून घेणाऱ्या या परिस्थितीत प्रेम करूणा, बंधुभाव, सेवा या गोष्टींचा शोध घ्यावा लागला, जाणीवपूर्वक चर्चा करावी लागली.

सत्ता, मत्ता व दर्जा या तीन सूत्रांच्या आधारे उभारलेली पुरुषसत्ताक समाजव्यवस्था व संस्कृती काही टप्प्यामधून वाटचाल करीत राहिली आहे. वरील तीन सूत्रांना समाजजीवनात (जित - जेते संबंधातून, युद्धांच्या पार्श्वभूमीवर) प्राधान्य व मध्यवर्ती

महत्त्व प्राप्त झाले तेव्हा तत्कालीन जेते समुदायांमधील स्त्रियांनी उत्साहाने व आग्रहाने पुरुषसत्ताक व्यवस्थेच्या निर्मितीला उचलून धरले.

ही सूत्री राबवायची तर पुरुषसत्ताकत्ता, इष्ट, योग्य व आवश्यक आहे, ही त्यांची प्रचिती होती. इतिहासात पुनःपुन्हा असे आढळेल की, जेत्या समाजातल्या स्त्रिया जित समाजांच्या संदर्भात पुरुषसत्ताक व्यवस्थाच उचलून धरीत आल्या. आणि स्वतः खोड्यात अडकल्या. जातीय व धार्मिक दंगलींच्या वेळी याचाच पुनःपुन्हा पडताळा येतो हे लक्षात घ्या. पुरुषांची बरोबरी सर्व क्षेत्रांमध्ये स्त्रिया सरसकट करू लागल्या व त्या जोरावर त्या पातळ्यांवर समाजजीवनात प्रविष्ट झाल्या. (समता व न्याय यांना अनुसरून.) पण समाजव्यवस्था व संस्कृती यांची आधारभूत त्रिसूत्री वरील प्रमाणेच राहिली तर काय चित्र दिसेल? आधुनिकतेने ओतप्रोत करिअरिस्ट स्त्रियांकडे पाहिले तर अंदाज बांधता येईल.

जेत्या, यशस्वी व बलिष्ठ पुरुषांबरोबर आम्हालाही सत्ता, मत्ता व दर्जा यांचे लाभ उपभोगायला मिळाले पाहिजे. व्यवस्था व संस्कृती यांची बैठक तीच राह्यला हरकत नाही असा एक प्रवाह स्त्रीवादी चळवळीत कळत- नकळत आहे. ज्या स्त्रीवादी स्त्रियांना ही मूल्यव्यवस्था पुरुषसत्ताकतेसह अव्हेरावयाची आहे त्यांनी हे ओळखायला हवे की आधुनिकतेच्या वैचारिक-सांस्कृतिक चौकटीत समता व न्याय, हक्क व अधिकार यावर आपली चळवळ उभारणे कामाचे नाही. चौकट साधुसंत, महात्म्ये यांनी उपदेशीलेल्या प्रेमाचीच असायला हवी.

प्रेम हा शब्द अतिशय उत्साहाने पुरुषसत्ताक संस्कृतीने आपलासा केलेला असल्याने सावधानतेची जरूरी आहे. खऱ्या वा उच्चतर प्रेमाच्या विश्वातून स्त्रियांना बाद करण्याची भूमिका गंभीरपणे मांडली जाताना आपणास प्लेटोच्या 'सिंपोझियम' या संवादात आढळते. मध्ययुगामध्ये समशेरबहाद्दर उमरावांच्या प्रेमसंबंधाचे गौरवपूर्ण चित्रण केले गेलेले आपण पाहतो. आत्मकेंद्री, उत्स्फूर्त, उत्कट भावविष्काराच्या स्वरूपात रोमँटिक प्रेमाचीही मांडणी आपल्या परिचयाची आहे. आणि 'पर्मिसिव्ह सोसायटी' च्या संस्कृतीमधली स्वैर लैंगिक संबंधांनाच प्रेमाचा मुक्त अविष्कार मानणारी आजची मांडणी. या सर्व मांडण्यांमध्ये काही गोष्टी समान आहेत. यांचा ऊहापोह वर येऊन गेलाच आहे.

काही हजार वर्षांपासून दृढमूल असलेल्या पुरुषसत्ताक मूल्यांना, व्यवस्थेला व संस्कृतीला आव्हान देण्याचे सामर्थ्य प्राप्त होण्यासाठी प्रेम व प्रेमसंबंध विषयक अधिक प्रगल्भ व सम्यक जाण उत्पन्न होणे आवश्यक आहे. कोणत्या दिशेने गेले असता ही जाण प्राप्त होईल त्याचीही स्पष्टता वर येऊन गेली आहे.

महाराष्ट्राच्या सार्वजनिक जीवनातील सुविख्यात व्यक्तींमधील प्रेमसंबंधाची दोन उदाहरणे घेऊन शेवटी एकदोन मुद्यांची स्पष्टता मी करणार आहे.

पहिले उदाहरण न्यायमूर्ती महादेव गोविंद रानडे व रमाबाई रानडे यांचे. अलीकडेच श्री. विद्वांस यांनी लिहिलेले रमाबाई रानडे यांचे चरित्र प्रसिद्ध झाले आहे. हे पुस्तक वाचल्यावर दोन गोष्टींचा ठसा माझ्या मनावर खोलवर उमटला. एक न्यायमूर्ती व रमाबाई . यांच्या परस्पर संबंधातले माधुर्य आणि रमाबाईंचे कर्तृत्व. एका विधुराने आपल्यापेक्षा वयाने पुष्कळ लहान असलेल्या मुलीशी, अजाण म्हणावे अशाच वयातल्या मुलीशी केलेला हा विवाह. रुढार्थाने पाहू गेल्यास प्रेमाची अभिव्यक्ती यांच्या परस्परसंबंधात आढळत नाही. रानड्यांच्या काळातही पाश्चात्त्य धर्तीचे 'रोमँटिक' प्रेम करणारी काही सुधारक मंडळी मुंबई - पुण्यात आढळत असणारच. तेवढा रोमँटिकपणाही रानड्यांच्या स्वभावात अभावानेच असावा! आधुनिक चष्मा लावून जर विद्वांसांचे पुस्तक वाचले तर रानड्यांवर थंडपणा, न्यायाचा पक्ष घेऊन रमाबाईंच्या पाठीशी खंबीरपणे उभे राहून संघर्ष न करण्याचा भ्याडपणा, पुरुषी श्रेष्ठत्वाला साजेसे वर्तन, पुरुषसत्ताक परंपरेचे समर्थन इत्यादी स्वरूपांचे आरोप करता येतील व त्यांना आधारही काढून दाखविता येतील. हे करता येईल पण ते असमंजसपणाचे होईल. कारण साधे सरळ आहे. रानड्यांच्या सुधारकी जीवनापायी व रानड्यांच्या स्वतः विषयीच्या अपेक्षा पूर्ण करण्यापायी रमाबाईंना खूप सोसावे लागले, पण या सगळ्यापलीकडे रमाबाईंना रानड्यांच्या प्रेमाची, उभ्या केलेल्या पाठबळाची, कौतुकाची प्रचिती सतत येत राहिली. आणि हा केवळ देखावा नव्हता. यात 'पहा मी किती व कसा आधुनिक/सुधारक आहे.' असे स्वतःचेच महत्त्व वाढविणेही नव्हते. रमाबाई नावाच्या रोपट्यामधून एक प्रचंड, विस्तीर्ण आधारवड आकारास

आला ते रानड्यांनी वर्षानुवर्षे अत्यंत सहृदयतेने व प्रेमाने केलेल्या संवर्धनाचे फळ होते.

दुसरे उदाहरण मला सुचते ते श्री. चिंतामणराव देशमुख व श्रीमती दुर्गाबाई यांचे. प्रेमात पडण्याचे वय निघून गेल्यावर अनेक वर्षांनी परस्परांच्या प्रेमात पडून लग्न केलेल्या या दोन व्यक्ती. रानडे - रमाबाई यांच्या तुलनेने हा खरोखर समान कर्तृत्वाच्या, स्वतंत्र प्रज्ञेच्या दोन व्यक्तींचा संबंध होता. आयुष्याच्या अशा टप्प्यावर दोघेही पोचलेले होते की जिथे एरवी लग्न करून स्वतःस अडकवून घेणे त्यांना नकोच वाटले असते. परस्परांच्या व्यक्तित्वांचे मिलनात विसर्जन होऊन एकत्वाची अनुभूती घेण्याची तीव्र आस हेच त्यांनी लग्न करण्याचे कारण असावे. 'मिलन' म्हणत असताना रतिसुखासाठीचे मिलन असा अर्थ काढणे हास्यास्पद ठरेल हेही उघड आहे.

'प्रथमदर्शनी प्रेम' निर्माण होणे अशक्य नाही. पण अशा दोन व्यक्ती सहजीवन जगू लागल्या (पतीपत्नी म्हणून वा अन्य प्रकारे) तरी ते गाढ, परिपक्व बनायला काळ तर जावा लागतोच. पण त्याहीपेक्षा महत्त्वाची गोष्ट, त्या व्यक्ती धीरगंभीर, क्षमाशील व प्रगल्भ बनून प्रेम देण्यास व घेण्यास पात्र व्हाव्या लागतात. समोरच्या व्यक्तीच्या ज्या गुणविशेषांनी आपणास प्रथम प्रेमात पाडलेले असते त्यांच्या पलीकडे व खोलवर आत दडलेल्या, अनेक पापुद्रयांच्या आत गाभ्याशी असलेल्या व्यक्तित्वाच्या कंदापर्यंत आपण पोचतो व त्याचा आत्मीय वृत्तीने स्वीकार करतो, त्याच्याशी एकरूप होतो तेव्हा खऱ्या अर्थाने प्रेमसंबंध प्रस्थापित होतो. ही प्रक्रिया घडण्यासाठी लग्नाआधी प्रेम बसलेले असणे आवश्यक नसते. प्रेमाचे बी लग्नानंतरही पडून प्रेम वृद्धिंगत होते.

याचा एक अर्थ असाही आहे की, कथा कादंबऱ्या, नाटक सिनेमा, कविता अन्य प्रसार माध्यमे यांच्या द्वारा प्रेमाचे जे चित्रण आपल्या पहाण्या - वाचण्यात येते ते खऱ्या अर्थाने प्रेम करण्यास व अनुभवण्यास आपणास कुचकामी बनवीत असते.

दुसऱ्यांच्या चुका, अपराध पोटात घालण्याइतके, सुखदुःखे वाटून घेण्याइतके, टक्क्याटोणप्यांनी बिथरुन न जाण्याइतके उदार, मोठे, क्षमाशील, सोशिक मन असणे प्रेमसंबंधासाठी अत्यावश्यक असते. तसेच जिच्या ठायी प्रेमभाव स्थिर झालेला असतो ती व्यक्ती वागण्या-बोलण्यात, चाल-चलणुकीत, खोल पात्रातून वाहणाऱ्या नदीच्या प्रवाहाप्रमाणे शांत, संथ व संयत बनत जाते. एक (वा अनेक) व्यक्तींशी प्रेमसंबंध असणे व अनुभवणे ही एक अखंड साधनाच असते.

वसंत पळशीकर अध्यापक निवास बोरावके महाविद्यालय

इस्लामपूर